जिल्हाधिकारी, पुणे कार्यालयाकरीता खाजगी वाहन पुरवठादारांकडून घेण्यात येणाऱ्या वाहनांचे दर करार निश्चित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. वाहन-२११९/प्र.क्र.९२/३१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - १० जून, २०२०.

संदर्भ:- १) शासन निर्णय क्र. संकीर्ण-१०१५/प्र. क्र. १४६/३१, दिनांक ०७.१०.२०१७.
२) जिल्हाधिकारी, पुणे यांचे पत्र क्र.पीसीए/कावि-१६-२०१६, दिनांक ०२.०७.२०१६.

**प्रस्तावना:-**

राज्यात येणाऱ्या राज्य अतिथी / मान्यवर यांच्या परिवहनाकरीता सर्व जिल्हाधिकारी कार्यालयांच्या अधिनस्त डि.व्ही. वाहने ठेवण्यात आली आहेत. तथापि जिल्ह्याच्या ठिकाणी एकाच वेळी अनेक मान्यवर भेटीसाठी आल्यास व डि.व्ही. वाहने अपुरी पडल्यास खाजगी वाहन पुरवठादारांकडून भाड्याने वाहन उपलब्ध करुन घेण्याबाबत दरकरार करण्यात येतो. जिल्हाधिकारी, पुणे कार्यालयाकडील यापूर्वी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये करण्यात आलेला दरकरार संपूष्टात आल्याने, भाडेतत्वावर वाहने घेण्याबाबत जिल्हाधिकारी, पुणे कार्यालयामार्फत ई-निविदा प्रक्रीया राबविण्यात आली होती. सदर ई-निविदा प्रक्रीयेनंतर निम्नतम दरास मान्यता देण्याची व या दराने जे खाजगी वाहन पुरवठादार वाहने पुरविण्यास तयार असतील त्या पुरवठादारांना शासन मान्य पुरवठादार म्हणून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पुणे जिल्ह्यास भेट देणाऱ्या सन्माननीय अतिथी व मान्यवरांच्या परिवहन व्यवस्थेसाठी शासकीय डि.व्ही. वाहने उपलब्ध नसताना खाजगी वाहन पुरवठादारांकडून भाड्याने वाहने पुरविण्याबाबत ई-निविदा प्रक्रीयेमध्ये प्राप्त झालेल्या या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र-अ मधील निम्नतम दरपत्रकास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या दराने तसेच निविदेतील अटी व शर्तीच्या अधिन राहून खालील पुरवठादारांकडून वाहने उपलब्ध करुन घेण्यासही या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| क्र. | वाहन पुरवठादाराचे नाव व पत्ता | दुरध्वनी क्रमांक |
|---|---|---|
| अ) | **मे. ब्लू मेरीडियन्स हॉलिडेज प्रा. लि., पुणे.**<br>९५५/९५६, विद्या विलास को.ऑ.हौ.सो. प्लॉट नं.१३, दिप बंगला चौक, शिवाजीनगर, पुणे-४११ ०१६. | **क्र.** ०२० २५६७४२७७<br>**मो.** ९८२२ ६०४२७७ |
| ब) | **मे. देसरडा ट्रॅव्हल्स, पुणे.**<br>सर्वे नं. ३२/१/१, श्री मंगल को. ऑ. हौ. सो. धनकवडी पोस्ट ऑफीस समोर, धनकवडी, पुणे-४३. | **क्र.** ०२० २४३७३११८<br>**मो.** ९८२२०९५९२१ |
| क) | **मे. जे. के. टूरीस्ट अँड ट्रान्सपोर्ट, पुणे**<br>शॉप नं. १४, हरपळे बिल्डींग, गाडीतळ, पुणे-२८. | **क्र.** ८३८००७७१०१<br>**मो.** ९४२३००६०८६ |
| ड) | **मे. श्रावणी टूर्स अँड ट्रॅव्हल्स, पुणे**<br>ए-५०१, एस नं. २६, इंटर्नल एक्सोटीका, पुणे शहर, ४११ ०६० | **क्र.** ९०९६४७४४६९<br>**मो.** ९३७१५८९००८ |

२. खाजगी पुरवठादाराकडून भाड्याने वाहने घेण्यासंदर्भात जिल्हाधिकारी, पुणे यांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

i. निविदा सुचनांमधील अटी व शर्तींच्या अधिन राहून सोबतच्या विवरणपत्रातील दर मान्य असलेल्या उपरोक्त पुरवठादारांचे पॅनेल तयार करण्यात यावे व वाहन पुरवठ्याबाबतचा आवश्यक तो दरकरार तात्काळ करुन घेण्यात यावा. तसेच निविदेतील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन होईल असे पहावे.

ii. सदर दरकरार **दिनांक १६.०२.२०२० ते १५.०२.२०२१ या** कालावधीसाठी लागू राहील.

iii. सदर दर करारामध्ये कोणतेही बदल वा सुधारणा करण्याचे अधिकार अंतिमत: शासनाचे राहतील.

iv. खाजगी वाहने भाड्याने उपलब्ध करुन घ्यावयाची झाल्यास जिल्हाधिकारी, पुणे यांनी वरील शासनमान्य पुरवठादारांकडूनच वाहने उपलब्ध करुन घ्यावीत.

v. वाहन पुरवठा केल्यानंतर त्याबाबतची देयके पुरवठादारांना ३ महिन्याच्या आत अदा करणे अभिप्रेत आहे. त्यासाठी वाहने भाड्याने घेतल्यानंतर जिल्हाधिकारी, पुणे यांनी वाहन पुरवठ्याबाबतची देयके तात्काळ प्राप्त करुन घेऊन ती आपल्या शिफारशीसह ३० दिवसाच्या आत न चुकता शासनास सादर करावीत.

vi. संबंधित पुरवठादारांनी वाहनाचा पुरवठा केल्यानंतर त्याबाबतचे देयके तात्काळ जिल्हाधिकारी, पुणे यांना सादर करावीत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००६१०१५०७१३४७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Protocol, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96b5b527d7131539d3b3eb3ba523bb3514dd3d3437a78ac0f73c6d8043215729, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2020.06.10 17:27:33 +05'30'

**( सतीश जोंधळे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र:- विवरणपत्र "अ"**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, पुणे.
२. जिल्हाधिकारी, पुणे.
३. उप सचिव (आस्थापना) सर्व मंत्रालयीन विभाग.
४. सामान्य प्रशासन विभाग/का.२५, मंत्रालय, मुंबई.
५. वित्त विभाग/व्यय-४, मंत्रालय, मुंबई.
६. मे. ब्लू मेरीडियन्स हॉलिडेज प्रा. लि., पुणे.९५५/९५६, विद्या विलास को.ऑ.हौ.सो. प्लॉट नं.१३, दिप बंगला चौक, शिवाजीनगर, पुणे-४११ ०१६.
७. मे. देसरडा ट्रॅव्हल्स, पुणे.सर्वे नं. ३२/१/१, श्री मंगल को. ऑ. हौ. सो. धनकवडी पोस्ट ऑफीस समोर, धनकवडी, पुणे-४३.
८. मे. जे. के. टूरीस्ट अँड ट्रान्सपोर्ट, शॉप नं. १४, हरपळे बिल्डींग, गाडीतळ, पुणे-२८.
९. मे. श्रावणी टूर्स अँड ट्रॅव्हल्स, ए-५०१, एस नं. २६, इंटर्नल एक्सोटीका, पुणे शहर, ४११ ०६०
१०. निवडनस्ती.

| सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.वाहन-२११९/प्र.क्र.९२/३१ (शापसे), दि.१०.०६.२०२० चे विवरणपत्र "अ" | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| भाडोत्री वाहने पुरविण्याचे न्यूनतम दर दर्शविणारा तक्ता (सर्व करांव्यतिरीक्त) | | | | | | | | |
| अ.क्र. | वाहनाचा प्रकार | वाहन वापराचे दर | | | | | | |
| | | ८ तास / ८० कि.मी. करिता दर (रु.) | १२ तास / १२० कि.मी. करिता दर (रु.) | २४ तास / २४० कि.मी. करिता दर (रु.) | बाहेरगावी २४ तास / ३०० कि.मी. करिता दर (रु.) | ८/१२/२४ तासा पुढील प्रत्येक तासाकरिता | ८०/१२०/२४० कि.मी. पुढील प्रत्येक कि.मी. करिता दर (रु.) | बाहेरगावी प्रत्येक कि.मी. पुढील दर (रु.) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | मर्सिडीझ ई-सिरीज | ११५०० | १५८०० | २९००० | ३२००० | १००० | ८५ | ८५ |
| २ | BMW-७-सिरीज | १२००० | १७५०० | ३५००० | ३५००० | १००० | १०० | १०० |
| ३ | फॉर्च्युनर /कॅमरी | ६०००० | ८००० | ९५०० | १३५०० | ४५० | ३५ | ३५ |
| ४ | होंडा सिटी / टोयोटा अल्टीस | २८०० | ३५०० | ६५०० | ८५०० | २०० | २५ | २५ |
| ५ | टोयोटा इनोव्हा क्रिस्टा | २५०० | २६०० | ५२०० | ५८०० | १५० | १७ | १७ |
| ६ | टोयोटा इनोव्हा | २२०० | २४०० | ३६६० | ४५५० | १०० | १४ | १४ |
| ७ | मिनीबस -१७ सिट | ९५०० | १०५०० | १२००० | १३५०० | ३५० | ३२ | ३२ |
| ८ | मिनीबस-३२ सिट | १४२०० | १९६०० | २२००० | २३५०० | ४५० | ४५ | ४५ |